**सन २०११-२०१२ या शैक्षणिक वर्षापासून माध्यमिक स्तरावरील पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या नवीन / अधिकच्या तुकडयांना कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर सुरू करण्यांस मान्यता देणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : व्हीओसी-२०११/५६८/प्र.क्र.१७२/व्यशि-४,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०४ जुलै, २०११

**संदर्भ** : १. प्रभारी संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण महाराष्ट्र राज्य, मुंबई
यांचे पत्र १) क्रमांक ७/अशातांवि/२०११/६३ दिनांक १९.०५.२०११.
२) क्रमांक ७/अशातांवि/१०२०११/६० दिनांक १४.०६.२०११.

**प्रस्तावना :-** केंद्र शासनाच्या नवीन शैक्षणिक धोरणानुसार माध्यमिक स्तरावर व्यवसाय शिक्षणाची जोड देऊन विद्यार्थ्यांमध्ये व्यवसाय शिक्षणाची आवड निर्माण करणे व प्राथमिक कौशल्य विकसित करण्याच्या दृष्टीने खालील तीन बहुकौशल्ययुक्त अभ्यासक्रम १९९६-९७ पासून सुरु करण्यात आले. सदर अभ्यासक्रम राज्यामध्ये १६९ शासकीय २२५ अशासकीय अनुदानित आणि ३८५ अशासकीय विनाअनुदानित संस्थामध्ये राबविण्यात येत आहेत.

१. V-1 मूलभूत तंत्रज्ञानाची ओळख (Introduction to Basic Technology-IBT),
२. V-2 अभियांत्रिकी तंत्रज्ञानाची मूलभूत तत्त्वे (Elements of Mechanical Engineering-EME)
३. V-3 विद्युत आणि इलेक्ट्रॉनिक्स तंत्रज्ञानाची मूलभूत तत्त्वे (Elements of Electrical and Electronics Techonology-EEET)

या अभ्यासक्रमांची वाढती मागणी लक्षात घेऊन शैक्षणिक वर्ष २०११-१२ पासून माध्यमिक स्तरावरील पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या अधिकच्या/नवीन तुकडया **कायम स्वरुपी विनाअनुदानित तत्त्वावर** सुरु करण्यासाठी व्यवसाय शिक्षण संचालनालयाकडून जाहीरात विज्ञापित करण्यात आली होती. त्यानुसार ५० संस्थांकडून अभ्यासक्रम सुरु करण्याचे प्रस्ताव संचालनालयास प्राप्त झाले होते. सदर प्रस्तावांची छाननी केल्यानंतर संचालनालयाने ३१ संस्थांमध्ये ३४ अधिकच्या /नवीन तुकड्या सुरु करण्याची शिफारस शासनास केली आहे. या ३१ संस्थांमध्ये माध्यमिक स्तरावरील पूर्वव्यवसायिक अभ्यासक्रम सुरु करण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :** माध्यमिक स्तरावरील पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या **३१** अशासकीय संस्थांमध्ये **३४** अधिकच्या/नविन तुकडया (सोबतच्या प्रपत्रात दर्शविल्याप्रमाणे) **कायमस्वरूपी विनाअनुदानित तत्वावर** शैक्षणिक वर्ष २०११-१२ पासून सुरू करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यांत येत आहे. याचा लाभ माध्यमिक स्तरावरील २०४० विद्यार्थ्यांना होईल.

**अटी व शर्ती**

१. संबंधित संस्थेस माध्यमिक शाळा संहितेमध्ये नमूद केलेल्या सर्व अटी व शर्तीची पूर्तता करणे बंधनकारक राहील.
२. मान्य अभ्यासक्रमांच्या नविन/अधिकच्या तुकडया सुरू करण्यांस **कायमस्वरूपी विनाअनुदानित तत्वावर** मान्यता दिली असली तरीही, भविष्यात कोणत्याही प्रकारचे अनुदान अथवा आर्थिक मदत देण्यांत येणार नाही.
३. मान्य अभ्यासक्रम राबविणा-या संस्थांना शासन/संचालनालय/संचालनालयाच्या अखत्यारीतील संबंधित कार्यालये यांच्या कडून वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या आदेशांचे पालन करणे बंधनकारक राहील.
४. शासनाने वेळोवेळी निश्चित केलेले शिक्षण शुल्क विद्यार्थ्यांकडून आकारणे संस्थेस बंधनकारक राहील.
५. **"कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर मान्यता मिळालेले माध्यमिक स्तरावरील पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम "** असा सूचना फलक संस्थांनी दर्शनी भागावर लावणे बंधनकारक राहील. सूचना फलकावर अभ्यासक्रमांच्या मंजूर तुकडयांची संख्या व मंजूर प्रवेश क्षमता याचा उल्लेख करण्यात यावा.

६. संबंधित संस्थेने मंजूर अभ्यासक्रमासाठी मानकानुसार आवश्यक असलेल्या सर्व पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देऊन तात्काळ अभ्यासक्रम सुरु करावेत.

७. सदर अभ्यासक्रमांना कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर मान्यता देण्यांत आल्यामुळे या अभ्यासक्रमाकरीता संस्थेने नियुक्त केलेल्या सर्व कर्मचारी वर्गाची सेवा /वेतन व तदनुषंगिक बाबींची जबाबदारी सर्वस्वी संबंधित संस्थेची राहील. याबाबत शासन कोणतीही जबाबदारी घेणार नाही.

८. मंजूर अभ्यासक्रमांकरीता आवश्यक कर्मचाऱ्यांच्या नियुक्त्या, त्यांची किमान शैक्षणिक अर्हता, अनुभव याबाबत संस्थेने महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मधील तरतुदींनुसार तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्यांत यावी.

९. भविष्यात सदरचे अभ्यासक्रम बंद करण्याबाबत, किंवा त्यात काही बदल करण्याबाबत शासनाने निर्णय घेतल्यास तो विनाअट, विनाविलंब संस्थेने अंमलात आणणे आवश्यक राहील.

१०. अभ्यासक्रमांच्या मंजूर तुकडयांमधील प्रवेशाकरीता, शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले सामाजिक/समांतर आरक्षण व इतर नियमांचे संस्थेने काटेकोरपणे पालन करावे व गुणानुक्रमे प्रवेश देण्यांत यावेत.

११. अभ्यासक्रमांना मंजूरी मिळाल्यानंतर सदर अभ्यासक्रम संस्थेत सुरू केल्याबाबतची माहिती संस्थेने महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक परिक्षा मंडळास तात्काळ द्यावी त्याबाबतची अनुषंगिक कार्यवाही करावी.

१२. मान्यता देण्यांत आलेल्या अभ्यासक्रमाच्या अधिकच्या/नविन तुकडयांची प्रवेश क्षमता प्रती तुकडी ६० असून, शैक्षणिक वर्ष २०११-२०१२ मध्ये मंजूर प्रवेश क्षमतेच्या ५०% पेक्षा कमी प्रवेश झाल्यास अशा तुकडया सुरू ठेवण्याकरीता संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिका-यांची परवानगी घेणे आवश्यक राहील. त्याचप्रमाणे सलग तीन शैक्षणिक वर्षांमध्ये मंजूर प्रवेश क्षमतेच्या ५०% पेक्षा कमी प्रवेश झाल्यास सदर अभ्यासक्रमाची तुकडी बंद करण्याची कार्यवाही करण्यांत येईल.

१३. शैक्षणिक गुणवत्ता वाढविण्यासाठी उपरोक्त अटी व शर्तीमध्ये बदल करण्याचे किंवा नविन अटी व शर्ती अंतर्भूत करण्याचे अधिकार शासनाचे राहतील.

शैक्षणिक वर्ष २०११-१२ मध्ये मान्यता दिलेल्या सोबतच्या यादीतील किती संस्थांनी व्यवसाय अभ्यासक्रम सुरु केले, अभ्यासक्रम निहाय प्रवेशित विद्यार्थी संख्या याबाबतची माहिती संचालक, व्यवसाय शिक्षण यांनी शासनास दि.३१.१०.२०११ पर्यंत सादर करावी.

हा शासन निर्णय राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असुन त्याचा संगणक सांकेतांक क्र. **२०११०७०४१८३९२४००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

**(शोभा वि. पत्की)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत :-

१) प्र. संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई -१

२) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक, (शालेय शिक्षण विभाग), मुंबई/पुणे/नाशिक/कोल्हापूर/लातूर/नागपूर/अमरावती/औरंगाबाद (यांचेकडे व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनायामार्फत)

३) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय, मुंबई /नाशिक/ पुणे/अमरावती/नागपुर (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालया मार्फत.)

४) संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी (संचालनालयामार्फत)

५) संबंधित अशासकीय संस्था (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालया मार्फत. त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सर्व संबंधित संस्थांना अवगत करावे.)

६) मा. मंत्री (उ व तंशि) यांचे खाजगी सचिव

७) मा. राज्यमंत्री (उ व तंशि) यांचे खाजगी सचिव

८) निवड नस्ती (व्यांश-४)

## शैक्षणिक वर्ष २०११-२०१२ पासून मान्यता देण्यात येणा-या पूर्व व्यवसायिक अभ्यासक्रमाचे नांव व तुकडयाची संख्या

| विभाग | जिल्हा | अ.क्र | संस्थेचे नांव व पत्ता | शैक्षणिक वर्ष २०११-१२ पासून देण्यात येणा-या पूर्व व्यवसायि अभ्यासक्रमाचे नांव व तुकडयांची संख्या | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | अभ्यासक्रमाचे नांव | मंजूर तुकडयाची संख्या प्रती तुकडी (प्रवेश क्षमता ६० विद्यार्थी) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| मुंबई | मुंबई उपनगर | १ | इंडियन एज्युकेशन सोसायटीची माध्यमिक शाळा, चारकोप, सेक्टर -२, कांदिवली (प.) मुंबई ६७ | विद्युत आणि इलेक्ट्रॉनिक्स तंत्रज्ञानाची मूलभूत तत्वे (व्हि-३) | २ |
| | रत्नागिरी | २ | हेरिटेज, कल्चर आर्ट ॲण्ड एज्युकेशन डेव्हलपमेंट सोसायटीचे न्यु इंग्लिश स्कूल, जावडे, ता. लांजा, जि. रत्नागिरी | मूलभूत तंत्रज्ञानाची ओळख (व्हि-१) | १ |
| पुणे | पुणे | ३ | श्री. पारमार्थिक सेवा संघ, मुंबई व्दारा संचलित, श्री भैरवनाथ विद्यालय व कनिष्ठ महाविद्यालय, (विज्ञान शाखा) मु. पो. शिंगवे, ता. आंबेगाव, जि. पुणे ४१२४०६ | मूलभूत तंत्रज्ञानाची ओळख (व्हि-१) | १ |
| | | ४ | श्री शिवाजी शिक्षण प्रसारक मंडळ, सासवड संचलित श्री केदारेश्वर माध्यमिक विद्यालय व ज्युनिअर कॉलेज, काळदरी, ता. पुरदंर, जि. पुणे | विद्युत आणि इलेक्ट्रॉनिक्स तंत्रज्ञानाची मूलभूत तत्वे (व्हि-३) | १ |
| | | ५ | महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीचे वाघिरे विद्यालय, सासवड, ता. पुरंदर, जि. पुणे ४१२३०१ | यंत्र अभियांत्रिकीची मूलभूत तत्वे (व्हि-२) | १ |
| | | | | विद्युत आणि इलेक्ट्रॉनिक्स तंत्रज्ञानाची मूलभूत तत्वे (व्हि-३) | १ |
| | | ६ | आचार्य अत्रे विकास प्रतिष्ठान पुरंदर संचलित न्यु इंग्लिश स्कूल जेऊर, पुरंदर,जि-पुणे | मूलभूत तंत्रज्ञानाची ओळख (व्हि-१) | १ |
| | | ७ | श्री पारमार्थिक सेवा संघ, मुंबई संचलित श्री संगमेश्वर माध्यमिक व कै. बाबुराव गेणुजी ढोबळे उच्च माध्यमिक कला व वाणिज्य विद्यालय पारगाव (शिंगवे) ता. आंबेगाव, जि. पुणे | मूलभूत तंत्रज्ञानाची ओळख (व्हि-१) | १ |
| | | ८ | विनित एज्युकेशन चॅरिटेबल ट्रस्टचे ज्ञानदिप इंग्लिश मिडियम स्कूल, जुन्या टोलनाक्याच्या समोर यशगंगा मार्बलच्या मागे, वडगाव (बुद्रुक) पुणे ४११०४१ | विद्युत आणि इलेक्ट्रॉनिक्स तंत्रज्ञानाची मूलभूत तत्वे (व्हि-३) | १ |

| विभाग | जिल्हा | अ.क्र | संस्थेचे नांव व पत्ता | शैक्षणिक वर्ष २०११-१२ पासून देण्यात येणा-या पूर्व व्यवसायि अभ्यासक्रमाचे नांव व तुकडयांची संख्या | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | अभ्यासक्रमाचे नांव | मंजूर तुकडयाची संख्या प्रती तुकडी (प्रवेश क्षमता ६० विद्यार्थी) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| पुणे | पुणे | ९ | भैरवनाथ शिक्षण मंडळाचे भैरवनाथ माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय, खुटबाव, ता. दौंड, जि. पुणे ४१२२०३ | मूलभूत तंत्रज्ञानाची ओळख (व्हि-१) | १ |
| | | १० | विद्या प्रतिष्ठान महाराष्ट्र संचलित श्री सरस्वती विद्या मंदिर माध्यमिक डहाणूकर कॉलनी, ८ वा रस्ता, कोथरुड, पुणे ४११०३८ | यंत्र अभियांत्रिकीची मूलभूत तत्वे (व्हि-२) | १ |
| | | ११ | पुणे छावणी परिषदेचे डॉ. आंबेडकर मेमोरियल हायस्कूल, सोलापूर बाजार, पुणे ४० | यंत्र अभियांत्रिकीची मूलभूत तत्वे (व्हि-२) | १ |
| | सातारा | १२ | हनुमान शिक्षण प्रसारक मंडळाचे विद्या विकास मंदिर, कलेढोण , ता. खटाव, जि. सातारा | मूलभूत तंत्रज्ञानाची ओळख (व्हि-१) | १ |
| | सांगली | १३ | कै. मारुती दादा पाटील सर्वांगीण विकास संस्थेचे आदर्श प्रशाला, नागज, ता. कवठेमहाकाळ, जि. सांगली | मूलभूत तंत्रज्ञानाची ओळख (व्हि-१) | १ |
| | | १४ | येरळा प्रोजेक्ट सोसायटीचे स्कूल ऑफ प्रोग्रेसिव्ह एज्युकेशन जालिहाळ (ब्रु), ता. जत, जि. सांगली | मूलभूत तंत्रज्ञानाची ओळख (व्हि-१) | १ |
| | | १५ | श्री सिध्दनाथ शिक्षण प्रसारक मंडळाचे श्री सिध्दनाथ विद्यालय, तिसंगी, ता. कवठेमहाकाळ, जि. सांगली | मूलभूत तंत्रज्ञानाची ओळख (व्हि-१) | १ |
| | सोलापूर | १६ | श्री भैरवनाथ शिक्षण प्रसारक मंडळाचे श्री छत्रपती शिवाजी विद्यालय, मु. पो. वीट, ता. करमाळा, जि. सोलापूर | मूलभूत तंत्रज्ञानाची ओळख (व्हि-१) | १ |
| नाशिक | नाशिक | १७ | सानेगुरुजी शिक्षण प्रसारक मंडळ, नाशिकरोड, संचलित न्यु. इंग्लिश स्कूल ॲण्ड ज्युनिअर कॉलेज, बारागाव, पिंप्री, ता. सिन्नर, जि. नाशिक | यंत्र अभियांत्रिकीची मूलभूत तत्वे (व्हि-२) | १ |
| | अहमद नगर | १८ | सानेगुरुजी शिक्षण प्रसारक मंडळ नाशिक रोड, संचलित न्यु हायस्कूल व ज्युनिअर कॉलेज, लिंगदेव, ता. अकोले, जि. अहमदनगर | यंत्र अभियांत्रिकीची मूलभूत तत्वे (व्हि-२) | १ |

श्री. वि. प. कर्णे

| विभाग | जिल्हा | अ.क्र | संस्थेचे नांव व पत्ता | शैक्षणिक वर्ष २०११-१२ पासून देण्यात येणा-या पूर्व व्यवसायि अभ्यासक्रमाचे नांव व तुकडयांची संख्या | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | अभ्यासक्रमाचे नांव | मंजूर तुकडयाची संख्या प्रती तुकडी (प्रवेश क्षमता ६० विद्यार्थी) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| नाशिक | धुळे | १९ | धनाई पुनाई विधायक मंडळ, निजामपूर सर्चलित इंदिरा गांधी माध्यमिक विद्यालय, निजामपूर - जैताणे, ता. साक्री, जि. धुळे | मूलभूत तंत्रज्ञानाची ओळख (व्हि-१) | १ |
| | | २० | नंदुरबार तालुका विधायक समितीचे साधना विद्यालय व कनिष्ठ महाविद्यालय, शनिमांडळ, ता. जि. नंदुरबार - ४२५४०८ | मूलभूत तंत्रज्ञानाची ओळख (व्हि-१) | १ |
| | बुलढाणा | २१ | लोक शिक्षण संस्था किनगाव राजा व्दारा संचलित नूतन माध्यमिक विद्यालय, किनगाव राजा, ता. सिंदखेडराजा, जि. बुलढाणा | विद्युत आणि इलेक्ट्रॉनिक्स तंत्रज्ञानाची मूलभूत तत्वे (व्हि-३) | १ |
| | | २२ | लोकशिक्षण संस्था किनगाव राजा व्दारा संचलित जीवन विकास तांत्रिक माध्यमिक विद्यालय दुसरबीड, ता. सिंदखेड राजा, जि. बुलढाणा | विद्युत आणि इलेक्ट्रॉनिक्स तंत्रज्ञानाची मूलभूत तत्वे (व्हि-३) | १ |
| औरंगा-बाद | औरंगा-बाद | २३ | श्री छत्रपती शिवाजी शिक्षण प्रसारक मंडळ, संचलित सावित्रीबाई फुले माध्यमिक व उच्च माध्यमिक कन्या विद्यालय, कन्नड, ता. कन्नड, जि. औरंगाबाद | एलिमेन्टस ऑफ मेकॅनिकल ईंजिनिअरिंग (व्ही - २) | १ |
| | | | | इलेमेंटस ऑफ इलेक्ट्रिकल ॲण्ड इलेक्ट्रॉनिक्स टेक्नॉलॉजी (व्ही - ३) | १ |
| | नांदेड | २४ | गोदावरी शिक्षण संस्था तळेगाव, ता. उमरी, जि. नांदेड | विद्युत आणि इलेक्ट्रॉनिक्स तंत्रज्ञानाची मूलभूत तत्वे (व्हि-३) | १ |
| | | २५ | जयकिसान बहुउद्देशिय सेवाभावी प्रतिष्ठाण अंतेश्वर संचलित कै. विठाई माध्यमिक विद्यालय, गोविंद कॉलनी, तरोडा (बु.) रोड, जि. नांदेड | विद्युत आणि इलेक्ट्रॉनिक्स तंत्रज्ञानाची मूलभूत तत्वे (व्हि - ३) | १ |
| | हिंगोली | २६ | महंमद इसाफ पटेल मेमोरियल एज्युकेशन सासोयटीचे राजीव गांधी उर्दु माध्यमिक शाळा जवळाबाजार, ता. औंढा (नागनाथ), जि. हिंगोली | एलिमेन्टस ऑफ मेकॅनिकल ईंजिनिअरिंग (व्ही - २) | १ |
| | बीड | २७ | शाहू महाराज बहुउद्देशिय सेवाभावी संस्था व शिक्षण प्रसारक मंडळआष्टी, जि. बीड व्दारा संचलित श्री गणेश टेक्निकल हायस्कूल आष्टी, जि. बीड | ईलीमेन्टस ऑफ मेकॅनिकल टेक्नॉलॉजी (व्ही - २) | १ |

| विभाग | जिल्हा | अ.क्र | संस्थेचे नांव व पत्ता | शैक्षणिक वर्ष २०११-१२ पासून देण्यात येणा-या पूर्व व्यवसायिक अभ्यासक्रमाचे नांव व तुकडयांची संख्या | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | अभ्यासक्रमाचे नांव | मंजूर तुकडयाची संख्या प्रती तुकडी (प्रवेश क्षमता ६० विद्यार्थी) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| नागपूर | नागपूर | २८ | श्रीराम शिक्षण संस्था, रामटेक व्दारा संचलित श्रीराम कन्या विद्यालय, गांधी वार्ड, रामटेक, ता.रामटेक, जि.नागपूर | मूलभूत तंत्रज्ञानाची ओळख (व्हि-१) | १ |
| | | २९ | राष्ट्रीय आदिवासी शिक्षण मंडळ संचलित जयसेवा आदिवासी माध्यमिक आश्रमशाळा, दाहोदा, पो.पथराई, ता.रामटेक, जि.नागपूर | मूलभूत तंत्रज्ञानाची ओळख (व्हि-१) | १ |
| | | ३० | राणी दुर्गावती आदिवासी बहुउद्देशीय संस्था संचलित राणी दुर्गावती आदिवासी माध्यमिक आश्रमशाळा, टांगला, ता.रामटेक,जि. नागपूर | मूलभूत तंत्रज्ञानाची ओळख (व्हि-१) | १ |
| | | ३१ | श्रीराम शिक्षण संस्था, रामटेक व्दारा संचलित श्रीराम विद्यालय, गांधी वार्ड, रामटेक, ता.रामटेक, जि.नागपूर | मूलभूत तंत्रज्ञानाची ओळख (व्हि-१) | १ |
| | एकूण | | | | ३४ |